**उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील मान्यताप्राप्त गोंदिया एज्युकेशन सोसायटी, गोंदिया संचलित गोंदिया एज्युकेशन सोसायटी, गोंदिया संचलित जे. एम. पटेल महाविद्यालय, भंडारा या महाविद्यालयातील संगणकशास्त्र या विषयाची ०४ पदे भरण्याबाबत ..**

# महाराष्ट्र शासन

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक: न्यायाप्र-२०२१/प्र.क्र.३७२/म.शि.५,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई -४०० ०३२.

दिनांक :- ११ एप्रिल, २०२२

**वाचा:-**

मा. मुंबई उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठ, नागपूर यांचे दिनांक ०२.१२.२०२१ चे आदेश.

**प्रस्तावनाः-**

गोंदिया एज्युकेशन सोसायटी, गोंदिया संचलित जे. एम. पटेल महाविद्यालय, भंडारा या महाविद्यालयामध्ये संगणकशास्त्र हा विषय सन १९८८ पासून विनाअनुदानित तत्वावर सुरू असून, अनुदान मिळण्याबाबतची याचिका मा. मुंबई उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठ येथे याचिका क्रमांक ४५५०/२०१६ दाखल केली होती. त्यामध्ये दिनांक १९.०१.२०१८ रोजीच्या आदेशान्वये दिनांक ०२.०१.२०१९ च्या शासन निर्णयान्वये काही अटीच्या अधीन राहून दिनांक ०१.१०.२०१० च्या विद्यार्थीसंख्येच्या आधारे एकूण ०४ पदे अनुदानास पात्र ठरविण्यात आली आणि सदरची पदे दिनांक ०९.७.२०२० च्या शासन निर्णयान्वये वेतनाच्या बांधिलकी खर्चाखाली समाविष्ट करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. सद्यःस्थितीत शासनाच्या दिनांक १२.११.२०२१ च्या शासन निर्णयान्वये २०८८ पदे भरण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. सदरची ०४ पदे या पदांमध्ये अंतर्भूत नसल्यामुळे आणि वित्त विभागाच्या दिनांक ०४.५.२०२० च्या शासन निर्णन्वये पदभरतीवरील निर्बंधामुळे सदरच्या ०४ पदास मान्यता देण्यात आलेली नाही. त्यामुळे गोंदिया एज्युकेशन सोसायटी यांनी पुनःश्च दुसरी याचिका क्रमांक १९४८/२०२० दाखल केलेली आहे. त्यामध्ये दिनांक ०२.१२.२०२१ रोजी मा. न्यायालयाने खालीलप्रमाणे निर्णय दिला आहेः-

"In view of the above, we allow the petition and direct the respondent No.४ to issue NOC to the petitioners within four weeks from the date of the order."

३. उक्त न्यायनिर्णयास अनुसरून संगणकशास्त्र या विषयाचे ०४ पदे भरण्याबाबतचा प्रस्ताव वित्त विभागाच्या उपसमितीसमोर सादर केला असता, उपसमितीने संगणकशास्त्र या विषयाची ०४ पदे भरण्यास मान्यता दिली असून याप्रमाणे शासनास्तरावरून आदेश निर्गमित करण्याची बाब या नस्तीवर विचाराधीन आहे.

**शासन निर्णयः-**

गोंदिया एज्युकेशन सोसायटी, गोंदिया संचलित जे. एम. पटेल महाविद्यालय, भंडारा या महाविद्यालयामध्ये संगणकशास्त्र या विषयाची रिक्त असलेली ०४ पदे भरण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहेः-

अ) प्रथमतः अतिरिक्त ठरलेल्या सहाय्यक प्राध्यापकांना रिक्त पदी तातडीने समायोजित करण्यात यावे. संबंधीत विषयाकरीता सहाय्यक प्राध्यापकाचे पद अतिरिक्त नसल्याचे विभागीय सहसंचालकांनी प्रमाणित केल्यानंतरच संबंधीतांना पदभरतीची जाहीरात देता येईल.

आ) निवड झालेल्या उमेदवारांची नियुक्ती सन २०२२-२३ या शैक्षणिक वर्ष सुरू होण्याच्या दिनांकापासून करण्यात यावी. तसेच वेतन सन २०२२-२३ या शैक्षणिक वर्ष सुरू होण्याच्या प्रथम दिनांकापासून सुरू करण्यात येईल. सदर बाब पदभरतीच्या जाहीरातीमध्ये नमूद करण्यात यावी.

इ) विभागाच्या आकृतीबंधात मंजूर असतील तेवढ्याच पदांवर पदभरती केली जावी. त्याव्यतिरिक्त पदांवरील पदभरती केल्यास अशा उमेदावाराच्या वेतनाची जबाबदारी ही संबंधीत संस्थेची असेल.

ई) अकृषि विद्यापीठ संलग्नित अशासकीय अनुदानित महाविद्यालयातील अनुज्ञेय पदभरती करताना विद्यापीठ अधिनियमातील विहीत तरतूदींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तसेच विहीत प्रक्रीयेअंती उमेदवाराच्या निवडीनंतर उमेदावारांना सन २०२२-२३ या शैक्षणिक वर्षाच्या प्रथम दिनांकास नियुक्ती आदेश निर्गमित करण्यात यावेत.

२. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्रमांक- पदनि-२०२२/प्र.क्र.१४/आपुक, दिनांक ११.०४.२०२२ च्या पत्राअन्वये प्राप्त झालेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२२०४१२११२२०८६००८ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

DATTATRAYA RAMBHAU KAHAR

Digitally signed by DATTATRAYA RAMBHAU KAHAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=HIGHER & TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=44c81ed7c5650383de2d3bd4939feb17be94c77ddf9380bfe3d4af1d10cfd393, serialNumber=6c5292c043ebba90984d77378c6e4fb506d9694e3e8f08dd386c5d3f42e79b10, cn=DATTATRAYA RAMBHAU KAHAR
Date: 2022.04.12 11:23:20 +05'30'

**( द.रा.कहार )**
**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१ /२, मुंबई / नागपूर,
३. महालेखापाल, (लेखापरिक्षा), महाराष्ट्र -१ /२, मुंबई / नागपूर,
४. जिल्हा कोषागार अधिकारी, भंडारा,
५. सह संचालक, उच्च शिक्षण, नागपूर विभाग, नागपूर.
६. प्राचार्य, गोंदिया एज्युकेशन सोसायटी संचालित जे.एम. पटेल महाविद्यालय, भंडारा.
७. कक्ष अधिकारी (व्यय-५) / आपुक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८. म.शि.५ कार्यासन, निवडनस्ती.